वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम या राज्य योजनेअंतर्गत वनाच्छादनाची पुन:स्थापना व पुनर्निर्मितीकरिता सन २०१५-१६ मधील बांधील कामांकरिता चालू बाब प्रस्ताव.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.१५१/फ-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०१ जुलै, २०१५

वाचा :- १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.९४/फ-२, दि.०६.०५.२०१४
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.९४/फ-२, दि.२२.१०.२०१४
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.९४/फ-२, दि.०९.०१.२०१५
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१९/२३८/२०१५-१६, दि.२०.०५.२०१५.

प्रस्तावना :-

राज्य योजना सन २०१५-१६ अंतर्गत “सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” (४४०६ ०४९२) या योजनेकरिता सन २०१५-१६ करिता एकूण रु.५७००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून रु.३९९०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सन २०१४-१५ या वर्षामध्ये वनाच्छादनाची पुन:स्थापना व पुनर्निर्मिती मधील चतुर्थ वर्षीय बांधील कामांकरिता संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयान्वये रु.१६३.६० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला होता.

२. आता, सन २०१५-१६ या वर्षामध्ये वनाच्छादनाची पुन:स्थापना व पुनर्निर्मिती मधील पंचम वर्षीय बांधील कामांकरिता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ वरील दि.२०.०५.२०१५ रोजीच्या पत्रान्वये रू.१८२.५० लक्ष रक्कमेचा चालू बाब प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केला असून सदरची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ रोजीच्या परिपत्रकामध्ये अर्थसंकल्पित निधीच्या ७० % च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रु.१८२.५० लक्ष इतकी रक्कमी ही अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत असल्यामुळे प्रस्तावांतर्गत **रु.१८२.५० लक्ष (०२ मजूरी - रु.१७३.०३ लक्ष व २१ पुरवठा व सामुग्री - रु.९.४७ लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधानशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन या वरील भांडवली खर्च, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (००)(०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या लेखा शिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११७३५४२५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.01 17:37:25 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

८) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**विवरणपत्र - १**

शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१५/प्र.क्र.१५१/फ-२, दि.०१.०७.२०१५

मासिक निधी विवरणपत्र सन २०१५-१६

**योजनेचे नांव :- राज्य योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत वनाच्छादनाची पुनस्थापना व पुनर्निर्मिती याकरिता पंचम वर्षीय बांधील कामे रु.१८२.५० लक्ष (४४०६ ०४९२)**

**(रु.लाखात)**

| तपशिलवार शीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | जुलै २०१५ | ऑगस्ट २०१५ | सप्टेंबर २०१५ | ऑक्टोबर २०१५ | नोव्हेंबर २०१५ | डिसेंबर २०१५ | जानेवारी २०१६ | फेब्रुवारी २०१६ | मार्च २०१६ | एकूण वाटप केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०२ मजूरी | १७३.०३ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२२ | १९.२७ | १७३.०३ |
| २१ पुरवठा व सामुग्री | ९.४७ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०७ | ९.४७ |
| **एकूण** | **१८२.५०** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.२७** | **२०.३४** | **१८२.५०** |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.01 17:37:52 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग